को. प. बंधारा वसंतनगर १, को. प. बंधारा वसंतनगर २ ता. दिग्रस जि. यवतमाळ या २ कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२३/प्र.क्र-१२१/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक: १२ मार्च २०२४.**

वाचा:
अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर यांचे क्र. २६६/यवतमाळ विभाग/२०२४, दि ५.०२.२०२४

**प्रस्तावना-**

शासनास सादर झालेल्या अंदाजपत्रकानुसार यवतमाळ जिल्ह्यातील सदर २ को.प. बंधारे स्थानिक नाल्यावर प्रस्तावीत आहेत. एकुण २ कामांची अंदाजित किंमत रु. २,२८,४८,९१९/- येत असून या कामांमुळे १२६.४६ सघमी पाणीसाठा निर्माण होणार आहे व ४८ हेक्टर सिंचन क्षेत्रास लाभ मिळणार आहे. त्यास अनुसरुन सदर योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

को.प. बंधारा वसंतनगर १, को.प. बंधारा वसंतनगर २ ता. दिग्रस जि. यवतमाळ या २ को.प. बंधाऱ्यांच्या एकूण किंमत रुपये **रू. २,२८,४८,९१९/- (अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार नऊशे एकोणीस फक्त)** किंमतीच्या प्रस्तावास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या मूळ अंदाजपत्रकानुसार तरतूद सोबत “जोडपत्र अ” मध्ये सादर करण्यात येत आहे .

१) उपरोक्त २ पैकी प्रत्येक योजनेस स्वतंत्ररित्या प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. आदेश एकत्रित केलेला आहे.

२) पाणी वापर संस्था स्थापन करण्यासाठी ठेकेदारास निविदेत अटी घालून बंधनकारक करण्यात यावे. WUA स्थापन होईपर्यंत निविदेच्या १०% रक्कम ठेकेदाराच्या देयकातून कपात करण्यात यावी. संस्था स्थापन झाल्यानंतर सदरची रक्कम वितरित करण्यात यावी. अपवादात्मक परीस्थितित संस्था स्थापित होऊ शकत नसल्यास सविस्तर कारणमीमांसेसह प्रस्ताव शासनास सादर करून शासनाच्या मान्यते नंतर कपात केलेली १०% निधी वितरित करण्यात यावा. संस्था स्थापन केल्याबद्दल ठेकदारास शासन निर्णय दि.११-०२-२०२२ मध्ये तरतुद केल्या प्रमाणे मानधन देण्यात यावे.

३) प्रकल्पासाठी अधीक्षक अभियंता/प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी कार्यस्थळी भेट देवून स्थळ व संरेखा निश्चित करुन प्रमाणित करणे आवश्यक आहे.

४) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व नियोजित वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

५) सदरचे काम पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

७) कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण बंधनकारक राहील.

a) काम सुरू करण्यापूर्वी

b) २५% पूर्ण झाल्यानंतर.

c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.

d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.

e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील. काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

अ) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/ त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे. किमान दोन वेळेस खुद्द कंत्राटदाराची उपस्थिती आवश्यक आहे.

ब) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उप अभियंता व एका टप्प्यामध्ये कार्यकारी अभियंता यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

क) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिका सोबत चित्रीकरणाचा Pen drive सादर करावा. तसे मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

ड) सदर चित्रीकरणाची प्रत कार्यकारी अभियंता यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करून होणार नाही.

इ) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या जिओपोर्टलवर Upload करण्यात यावी.

८) काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

९) वरील प्रमाणे प्रकल्पाचे हस्तांतरण झाल्यानंतरचा देखभाल दुरुस्तीचा खर्च लाभार्थ्यांकडून करण्यात यावा.

१०) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नागरी २०११/प्र.क्र.१९२/निधी जल-१ दिनांक ०२ फेब्रुवारी २०१२ अन्वये निर्धारित तरतुदींचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

११) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नविन घटकांचा शासन मान्यते शिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

१२) प्रकल्पाचा दर्शक नकाशा अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता यांच्या मार्फ़त प्रमाणित करुन घेण्यात यावा.

१३) तांत्रिक मान्यतेपुर्वी सर्व योजनांना सक्षम प्राधिकाऱ्याकडुन वहन अंतर प्रस्ताव मंजुर करुन घेण्यात यावा.

१४) सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

१५) पाणीसाठा करण्याच्या दृष्टीने जिल्हा जलसंधारण अधिकारी व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी काम पुर्ण झाल्यावर प्रमाणित करणे आवश्यक राहील.

१६) शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं. व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

१७) प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानुसार काम पुर्ण करण्यात यावे.

१८) आवश्यकतेनुसार अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने, बाह्य दरसूची बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

१९) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकात वापरण्यात आलेली पीक रचना जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांच्या कडुन प्रमाणित करुन घ्यावी.

२०) B.C Ratio अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता यांनी प्रमाणित करावे.

२१) E.R.R Calculation अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता यांनी प्रमाणित करावे.

२.०. या २ योजनांच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रं.** ZH-५

**४७०२, लहान पाटबंधारे योजना**

**४७०२ ए ०१९**

**००**

**१०१, भूपृष्ठ जल,**

**लहान पाटबंधारे**

**(०१) लहान पाटबंधारे योजना,**

**०-१०० हे सिंचन क्षमता (कार्यक्रम),**

**५३ मोठी बांधकामे**

**३.०** प्रस्तुत आदेश प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१२१८०००४४७२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.12 18:09:13 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
४. सर्व मा. संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा. मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८. सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
९. मा. सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१०. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
१३. अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर.
१४. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.
१५. प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपूर.
१६. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, यवतमाळ.
१७. कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (जल-१).

**मृद व जलसंधारण विभाग**

**जोडपत्र 'अ'**

**को.प. बंधारा वसंतनगर १, को.प. बंधारा वसंतनगर २ ता. दिग्रस जि. यवतमाळ या २ कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२४/प्र.क्र- १२१/जल-१, दिनांक १२ मार्च, २०२४.**

| अ.क्र | उपशीर्ष | को.प. बंधारा वसंतनगर १ ता. दिग्रस जि. यवतमाळ | को.प. बंधारा वसंतनगर २ ता. दिग्रस जि. यवतमाळ |
|---|---|---|---|
| १ | ए-प्राथमिक | ० | ० |
| २ | बी-भूसंपादन | ० | ० |
| ३ | सी-कामे | १०५७००९७ | १०४९२१७० |
| ४ | के- इमारत | ० | ० |
| ५ | एम- वृक्षारोपण | ० | ० |
| ६ | ओ- संकिर्ण | १०००० | १०००० |
| ७ | पी- देखभाल | १०००० | १०००० |
| ८ | आर- दळणवळण | १०००० | १०००० |
| | **कामाप्रित्यर्थ एकुण रु.** | १०६०००९७ | १०५२२१७० |
| ९ | स्वामित्व शुल्क | ३४७१६५ | ३४७१६५ |
| १० | वस्तु व सेवा कर १८% | १९३३७२१ | १५७४८६७ |
| ११ | centages Charges १० % | ८६६६३८ | ८६००१४ |
| | **एकूण** | **११४६६७३५** | **११३८२१८४** |

**एकूण रू. २,२८,४८,९१९/- (अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार नऊशे एकोणीस फक्त)**

PRAKASH
NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.12 18:09:29 +05'30'

(प्र. नि. पाटील)
कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,
महाराष्ट्र शासन